**केंद्र शासन व हरियाणा राज्यामार्फत दिनांक २ ते १७ फेब्रुवारी, २०१९ या कालावधीत सुरजकुंड मेला, फरिदाबाद हरियाणा येथे आयोजित केलेल्या मेळाव्यामध्ये सहभागी होऊन महाराष्ट्र पर्यटनामार्फत प्रतिकृती (Replica) तयार करण्याच्या अंदाजपत्रक व आराखड्यास मान्यता देऊन निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिडीसी २०१८/१०/प्र.क्र.९६३/पर्यटन,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ जानेवारी, २०१९.

| | |
|---|---|
| वाचा : | १. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक- अर्थसं २०१८/प्र.क्र. ६९/अर्थ-३, दिनांक २.४.२०१८.<br>२. अपर मुख्य सचिव, पर्यटन विभाग, हरियाणा यांचे अर्धशासकीय पत्र क्रमांक- एसकेएमए २०१८/ ६८३९, दिनांक ३१.५.२०१८.<br>३. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांचे पत्र क्रमांक- मपविम/बांधकाम/सुरजकुंड मेला/ २०१८/ ४४९८, दिनांक १२.१२.२०१८.<br>४. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, पत्र क्रमांक- टिडीएस २०१८/४/प्र.क्र. ४००/पर्यटन, दिनांक १०.७.२०१८. |

**प्रस्तावना :**

केंद्रीय पर्यटन मंत्रालय व पर्यटन विभाग, हरियाणा यांच्यामार्फत दिनांक २ ते १७ फेब्रुवारी, २०१९ या कालावधीत सुरजकुंड, हरियाणा येथे कला आणि संस्कृती मेळाव्यामध्ये महाराष्ट्रास थीम पार्टनर म्हणून सहभागी केले आहे. त्या अनुसरुन महाराष्ट्र राज्यातर्फे महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने या कार्यक्रमात सहभागी होऊन, मेळाव्यात थीम रिप्लीका आणि इतर अनुषंगिक कामाच्या आराखडे व अंदाजपत्रकास मान्यता देणे व निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्यातील पर्यटन स्थळांची राष्ट्रीय व आंतराष्ट्रीय स्तरावर प्रसिध्दी व त्याच्या विकासास उत्तेजन देणे, निरनिराळे पर्यटन महोत्सव साजरे करणे यासाठी सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षात पर्यटन विभागासाठी “प्रसिध्दी” या लेखाशिर्षाखाली रुपये ७८.०० कोटी नियतव्यय अर्थसंकल्पित आहे. वित्त विभागाच्या दिनांक २.४.२०१८ च्या शासन परिपत्रकानुसार सदर अर्थसंकल्प नियतव्ययापैकी ७०% म्हणजेच रुपये ५४.६० कोटी इतका निधी मासिक निधी वितरण प्रणालीप्रमाणे वितरणास उपलब्ध आहे.

२. सदर उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून केंद्रीय पर्यटन मंत्रालय व पर्यटन विभाग, हरियाणा यांच्यामार्फत दिनांक २ ते १७ फेब्रुवारी, २०१९ या कालावधीत सुरजकुंड, हरियाणा येथे कला आणि संस्कृती मेळाव्यामध्ये महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने सहभागी होऊन महाराष्ट्र पर्यटनातर्फे प्रतिकृती (Replica) तयार करण्यास व इतर अनुषंगिक कामांसाठीच्या रुपये १,५०,७०,००४/- (अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लक्ष सत्तर हजार चार

फक्त) इतक्या रकमेच्या खाली नमूद केल्यानुसार अंदाजपत्रक व आराखड्यास मान्यता देऊन निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजित किमत (रुपये) |
|---|---|---|
| १ | सुरजकुंड मला, फरिदाबाद, हरियाणा येथे रायगड किल्ला आधारित प्रतिकृती (Replica) विकसित करण्याबाबत. | १,१६,८८,४६५.०० |
| | वस्तू व सेवा कर १८% | २१,०३,९२३.०० |
| | सल्लागार फी | ६,९८,०००.०० |
| | **एकूण** | **१,४४,९०,३८९.००** |
| | आकस्मिक खर्च ४% | ५,७९,६१५.०० |
| | **एकूण रक्कम** | **१,५०,७०,००४.००** |

३. सदर कार्यक्रमाच्या नियोजनास व खर्चास मा.मंत्री (पर्यटन) व अध्यक्ष, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

४. प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग शासन परिपत्रक दिनांक २.४.२०१८ च्या परिच्छेद ७ ते १८ मधील प्रत्येक अटीची खालील प्रमाणे पुर्तता करण्यात आली आहे. परिच्छेदनिहाय तपशिल खालील प्रमाणे आहे.

| अ.क्र. | परिपत्रकातील परिच्छेत क्र. | विषय | विभागाचे अभिप्राय |
|---|---|---|---|
| १ | ७-अ | एखाद्या योजनेस / प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देणे | प्रशासकीय विभाग असलेल्या अधिकाराअंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. |
| २ | ७-ब | अर्थसंकल्पिय तरतूद करणे आवश्यक असते (योजनांतर्गत नियतव्यय उपलब्ध) व अर्थसंकल्पित करणे | अर्थसंकल्पीय तरतूद उपलब्ध आहे. |
| ३ | ८ | प्रशासकीय विभागांना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१ वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-१०.०८/ प्र.क्र.७०/ विनियम, दिनांक १५.५.२००९ अन्वये अधिकार असणे | वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग- पहिला, उप विभाग एक अ.क्र. २७ नियम क्र. १४९ नुसार प्रशासकीय विभागांला पूर्ण अधिकार आहे. |
| ४ | ९ | विविध शासकीय / प्रशासकीय संस्थांना तसेच अनुदानित संस्थांना सहायक अनुदाने मंजूर करण्यापूर्वी त्यांचेकडून पूर्वी खर्च केलेल्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे प्राप्त करुन घेणे | वेळोवेळी प्राप्त करुन घेण्यात येतात. |

| | | | |
|---|---|---|---|
| ५ | १० | विभागाद्वारे संक्षिप्त देयकाद्वारे निधी खर्च करण्यात येतो. त्याचे तपशीलवर देयक सादर न केल्यामुळे लेखा आक्षेप येतात व अपहार संभवतात. | लागू नाही. |
| ६ | ११ | स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदाने | लागू नाही. |
| ७ | १२ | वैयक्तिक लाभार्थीच्या योजनेची देयके | लागू नाही. |
| ८ | १३ | शिष्यवृत्ती / शिक्षणशुल्काची प्रतिपूर्ती, वैयक्तिक लाभार्थी यांची प्रदाने | लागू नाही. |
| ९ | १४ | बांधकाम विषयक प्रस्तावासंदर्भात प्र.मा./तां.मा. तसेच आवश्यक तेथे सचिव समितीची मान्यता | लागू नाही. |
| १० | १५ | दुय्यम कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रितसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढण्यात यावेत | लागू नाही. |
| ११ | १६ | साहित्य खरेदीची प्रक्रिया पूर्ण करुन पुरवठादार निश्चित झाल्याशिवाय खरेदीची देयके कोषागारातून आहरित करण्यात येऊ नये. | लागू नाही. |
| १२ | १७ | विविध कारणांमुळे अखर्चित राहिलेला निधी विभागांची त्यांच्या अधिनस्त महामंडळाकडे हस्तांतरीत करुन तांत्रिकदृष्टया खर्च झाल्याचे दाखविले जाते. | लागू नाही. |
| १३ | १८ | विभागांमार्फत करण्यात येणारे संगणकीकरण संदर्भातील खर्च शासनाचे दरपत्रकानुसार/निविदाद्वारे करण्यात यावा. | लागू नाही. |

५. तसेच वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक- अर्थसं-२०१८/प्र.क्र. ६९/अर्थ-३, दिनांक २.४.२०१८ च्या परिशिष्टामधील तपासणी सूचीबाबतील अनुक्रमांक १, २ व ३ ची पुर्तता करण्यात आली आहे. अ.क्र. ४ बाबत स्पष्ट करण्यात येते की, लेखापरिक्षक / महालेखापाल यांचे कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत. यापूर्वी या कामांसाठी निधी वितरीत केलेला नाही. त्यामुळे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

६. वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक- संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३४/कोषा-प्रशा-५, दिनांक २४.७.२०१५ अन्वये दिलेल्या सुचनेनुसार खालील प्रमाणे प्रमाणित करण्यात येत आहे.

| अ. क्र. | **तपासणी सूची** | **पर्यटन विभागाचे अभिप्राय** |
|---|---|---|
| १) | योजनेस प्रशासकीय मान्यता | प्रस्तावित निधीच्या अनुषंगाने प्रशासकीय मान्यता देण्यात आहे. |
| २) | निधी वितरण शासन निर्णयातील अटी व शर्तीचे पुर्तता झाल्यानंतरच होणार आहे. | शासन निर्णयात अटी व शर्ती नमूद करुन निधी कार्यान्वयीन यंत्रणेस वितरीत करण्यात येतो. |

| | | |
|---|---|---|
| ३) | यापूर्वी वितरीत केलेल्या निधीपैकी ७५% खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र | सन २०१८-२०१९ मध्ये निधी वितरणाचे आदेश काढलेले नाहीत. |
| ४) | यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक / महालेखापाल यांच्याकडून कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत. | नाही. |
| ५) | निधी लाभार्थ्याच्या थेट खात्यात जमा होणार आहे. | लागू नाही. |
| ६) | वस्तु खरेदी करण्यापूर्वी खरेदी केलेल्या अशा वस्तुंची नोंद Dead Stock रजिस्टर मध्ये घेण्यात आली असून त्याचा योग्य वापर झाला असून त्या पडून नाहीत, असे प्रमाणपत्र | लागू नाही. |
| ७) | यामधून खरेदी होणार असल्यास प्रत्यक्ष वस्तु प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना देयक अदा केले जाणार आहे. | भांडवली वस्तु खरेदीचे प्रकरण नाही. लागू नाही. |
| ८) | आवश्यक त्या ठिकाणी आदिवासी / सामाजिक न्याय विभाग यांची निधी वितरणास सहमती आहे. | लागू नाही. |
| ९) | प्रस्तुत योजनेत कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. | संक्षिप्त देयकावर निधी आहरित करण्यात येत नाही. |
| १०) | निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे. | निधी कार्यान्वयीन यंत्रणेस (महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास) देण्यात येणार आहे व तो महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाच्या बँक खात्यात जमा करण्यात येतो. |

७. खालील अटी व शर्तीच्या अधिन राहुन महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास रुपये १,५०,७०,००४/- फक्त (अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लक्ष सत्तर हजार चार फक्त) अदा करण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे.

<u>अटी व शर्ती</u> :-

१) महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने सदर खर्च विहित प्रक्रीया राबवून मा.मंत्री (पर्यटन) व अध्यक्ष, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांच्या मान्यतेने करावा. विशिष्ट प्रयोजनासाठी चिन्हांकित न झालेल्या निधीचा वापर शासन मान्यतेने करण्यात येईल.

२) प्रसिध्दीकरिता मंजूर करण्यात आलेला निधीमधून महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने वर नमूद खर्च करावा.

३) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तिय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तिय मान्यता घेणे आवश्यक आहे.

४) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गतविहीत केलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

५) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही, याबाबतची सर्व जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांची राहील व जादा खर्चाची प्रतिपुर्ती शासनाकडून केली जाणार नाही.

६) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक- संकीर्ण-१००२/प्र.क्र. १५/कोषा-प्र ५, दिनांक ६.२.२००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल, याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक- बीजीटी-१०.००/प्र.क्र. ५६/२०००/वित्तीय सुधारणा, दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

७) केवळ तरतूद उपलब्ध आहे म्हणून खर्च करण्यात येऊ नये.

८) कोणतीही बांधीलकी (commitment) स्विकारण्यापूर्वी त्या कार्यक्रम/उपक्रम/कार्यवाहीतुन काय लाभ होईल याची काय क्षमता आहे ते प्रथम काळजीपूर्वक तपासण्यात यावे, त्याची लेखी नोंद ठेवण्यात यावी व कार्यक्रम/उपक्रम/कार्यवाही झाल्यानंतर त्याची पडताळणी करुन त्याचा तपशिल महामंडळाच्या अभिलेखावर ठेवण्यात यावा.

९) सदर रक्कमेच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयाशी ताळमेळ घालून अहवाल शासनास सादर करावा. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक झेडडी - ४, "३४५२-पर्यटन, ०१-पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१- पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (०४) प्रसिध्दी (३४५२ १९३१) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.

१०) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली सहायक अनुदानाची रक्कम आहरीत करुन संबंधितांना वितरीत करण्याकरिता श्री.र.ल.लखोटे, कार्यासन अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्री.सु.भि. पाटणकर, सह सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी वरील निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या सहायक अनुदानाची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

११) सदर निधी "कक्ष अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय,मुंबई" (Desk Officer, Tourism and Cultural Department, Mantralaya, MUMBAI) या नावे E.C.S. द्वारे उपलब्ध करुन देण्यात यावा.

१२) हा शासन निर्णय, वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थस-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.२०१६ तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग- पहिला, उप विभाग एक अ.क्र.२७ नियम क्र.१४९ प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सकेतांक २०१९०१२४१२२०५९६२२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Laxmikant Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ae5e5678dc8c9d9c01f7043448a53f6a9fbe81e46d183af43c9a9e01eb42c7c7, serialNumber=93c11f919f0c5fba6953b4841cc8cfd46b2b788da139e3f21b3d79d2cf976efa, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2019.01.24 12:29:33 +05'30'

**( र.ल.लखोटे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा. मंत्री, पर्यटन यांचे खाजगी सचिव
२) मा. राज्यमंत्री, पर्यटन यांचे खाजगी सचिव
३) सचिव, पर्यटन
४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
५) महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
६) महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
७) महालेखापाल (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११) नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
१२) वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई.
१३) अवर सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई.
१४) निवड नस्ती.

***